पोलीस विभागाच्या विविध आस्थापनांवरील
अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पोलीस ३११८/प्र.क.१०९/पोल-५अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२२

वाचा :-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक-पोलीस-३११८/प्र.क्र.१०९/पोल ५अ, दि.०१.१०.२०२१
२) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.) पोलीस महासंचालक कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२६-ब/६१४३/सपोनि-पोना/०३/२००३, दि.१९.०१.२०२१
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२

**शासन निर्णय:-**

शासनाने पोलीस शिपायांच्या एकूण मंजूर पदांपैकी १५,००० पदांची श्रेणीवाढ करुन पोलीस नाईक ही पदे निर्माण करण्याचा तसेच पोलीस उपनिरीक्षकांच्या एकूण मंजूर पदांपैकी १५०० पदांची श्रेणीवाढ करुन सहाय्यक पोलीस निरीक्षक ही पदे निर्माण करण्याचा निर्णय घेतला व त्याप्रमाणे ही पदे दिनांक ०१.०११.१९९२ पासून निर्माण करण्यात आलेली आहेत. सदर पदांना संदर्भ क्र.१ येथील दि.०१.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२१ ते दिनांक दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती.

२. सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.) पोलीस महासंचालक कार्यालय,मुंबई यांनी संदर्भ क्र. २ येथील दि.१९.०१.२०२२ रोजीच्या पत्रान्वये उक्त अस्थायी पदांना दिनांक दि.०१.०३.२०२२ पासून पुढे मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदरहू पदांना **दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२** या कालावधीकरिता खालील अटींच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देत आहे :-

**अटी :-**

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. २२.०२.२०२२ नुसार विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्यासाठी तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्याचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संबंधित आस्थापनांची राहील.

४) **सदर कालावधीमध्ये मंजूर पदाच्या आढाव्यास तसेच सुधारीत आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरिता पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी योग्य तो प्रस्ताव शासनास सादर करावा. तसे न केल्यास मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्धवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी पोलीस महासंचालक यांची राहील याची नोंद घ्यावी.**

३. यावरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तिय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१) "२०५५-पोलीस-१०९-जिल्हा पोलीस दल - (००)(०१) जिल्हा पोलीस बल. "
२) "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन -(००) (०१) पोलीस निरीक्षणालय."
३) "२०५५-पोलीस-१०१-गुन्हा अन्वेषण व दक्षता-(००) (०१) गुन्हा अन्वेषण विभाग."
४) "२०५५-पोलीस-००३-शिक्षण व प्रशिक्षण (००) (०१)-पोलीस प्रशिक्षण विद्यालय."
५) "२०५५-पोलीस-१०१-गुन्हा अन्वेषण व दक्षता (००)(०३) लाचलुचपत विरोधी केंद्र ."
६) "२०५५-१११- रेल्वे पोलीस (००)(०३) रेल्वे पोलीस."
७) "२०५५-१०८-राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस."
८) "२०५५-पोलीस १०५-सीमा सुरक्षा दल (००) (०१) सीमा सुरक्षा दल."
९) "२०५५-पोलीस ११२-बंदर पोलीस (००)(०१) नदी, बंदर व सागरी पोलीस"
१०) "२०७०-इतर प्रशासनिक सेवा."

४. सदर शासन निर्णय संदर्भ क्र.३ येथील वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक-पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८११२८१९६९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD
GANESH SUDAM

Digitally signed by GAIKWAD GANESH SUDAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=f88a2df366dbf702eda9179bfdd100f151490e691798947c7f6d1b8cf0dab7d6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0585EFA444AE7B29EC4D54E290F9F826C6E4DE96799148FCFC4C6E13F203B34E, cn=GAIKWAD GANESH SUDAM
Date: 2022.03.28 11:28:56 +05'30'

**( गणेश गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. पोलीस महासंचालक, अँटी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अपर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
७. प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालय खंडाळा, जि.पुणे/ जालना/ अकोला/ नागपूर/ नानवीज दौंड/ मरोळ, मुंबई/ सोलापूर/ बाभळगाव, जि.लातूर
८. प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर.
९. सर्व पोलीस आयुक्त.
१०.सर्व पोलीस अधीक्षक.
११.सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
१२.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
१३.महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
१४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१७.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तीय सुधारणा-१/आपुक
१८. निवडनस्ती (पोल-५अ).